**श्री.ग.ना.इवरकर, नगर रचनाकार (गट-अ) यांच्या बदलीने पदस्थापनेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

नगर विकास विभाग,

**शासन निर्णय क्रमांक**:- टिपीव्ही -२४१४/प्र.क्र.७४/२०१४/नवि-२७

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,

मंत्रालय, मुंबई-४०००३२

दिनांक: **१२** सप्टेंबर,२०१४

**शासन निर्णय :**

संचालक, नगर रचना व मुल्यनिर्धारण विभाग, पुणे यांच्या अधिपत्याखालील, नगर रचनाकार (गट-अ) या संवर्गामधील खालील अधिकाऱ्याची सार्वजनिक सेवेच्या हितार्थ व प्रशासकीय सोयीच्या दृष्टिने महाराष्ट्र नागरी सेवा (शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्य पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध) अधिनियम २००५, मधील कलम ३(१),४(४) खालील परंतुक(एक),(दोन) व कलम ४(५) मधील तरतुदींनुसार खाली दर्शविल्याप्रमाणे बदली करण्यात येत आहे:-

| **अधिकाऱ्याचे नाव** | **सध्याचे कार्यालय** | **बदलीनंतरचे कार्यालय** |
|---|---|---|
| श्री.ग.ना.इवरकर | उपसंचालक, नगर रचना,मुंबई प्रदेश मुल्यांकन, मुंबई | सहायक संचालक, नगर रचना, ठाणे शाखा ( रिक्त पदी ) |

**३.** उपरोक्त बदलीच्या अनुषंगाने संचालक, नगर रचना, पुणे तसेच उपसंचालक, नगर रचना, मुंबई प्रदेश मुल्यांकन, मुंबई यांना कळविण्यांत येते की, श्री.ग.ना.इवरकर यांना बदलीच्या ठिकाणी रुजू होण्यासाठी कार्यालयीन आदेशाद्वारे तात्काळ कार्यमुक्त करावे. तसेच बदलीच्या ठिकाणी हजर होण्यासाठी त्यांना कोणत्या दिनांकास कार्यमुक्त केले आणि बदलीच्या ठिकाणी सदर अधिकारी कोणत्या दिनांकास हजर झाले याबाबत शासनास त्वरीत कळवावे. श्री.इवरकर यांनाही कळविण्यात येते की, त्यांनी बदलीच्या ठिकाणी अनुज्ञेय असलेल्या विहित पदग्रहण अवधीतच रुजू व्हावे.

**५.** सदर बदलीच्या पार्श्वभूमीवर श्री.इवरकर यांना कोणत्याही कारणास्तव मूळ कार्यालयाने रजा मंजूर करु नये अथवा महाराष्ट्र नागरी सेवा (रजा) नियम १९८१ मधील नियम ३० (सी) नुसार अशा

अधिका-यांचे कोणत्याही प्रकारचे रजेचे अर्ज स्विकारु नयेत. तसेच रजेबाबतचे असे अर्ज प्राप्त झाल्यास ते संबंधित अधिकाऱ्याच्या मूळ पत्त्यांवर नोंदणीकृत पोच देय डाकेने परत करावेत.

६. सदर बदली आदेशानुसार बदलीच्या ठिकाणी तात्काळ हजर न झाल्यास वा राजकीय दबाव आणून बदली रद्द करण्याचा प्रयत्न झाल्यास त्याची संबंधित अधिका-याच्या गोपनीय अहवालात नोंद घेण्यात येईल. तसेच राजकीय दबावाबाबतची अशी कृती महाराष्ट्र नागरी सेवा ( वर्तणूक ) नियम, १९७९ मधील नियम क्रमांक २३ चे उल्लंघन करणारी असल्यामुळे ती गैरवर्तणूक समजून त्यांचेविरुध्द शिस्तभंगविषयक कारवाई करण्यांत येईल, याची बदली झालेल्या अधिकाऱ्यानी नोंद घ्यावी.

७. संचालक, नगर रचना महाराष्ट्र राज्य, पुणे यांना आणखी असेही कळविण्यात येते की, सदर बदलीच्या अनुषंगाने रिक्त होणाऱ्या पदाचा अतिरिक्त कार्यभार त्याच कार्यालयातील समकक्ष दर्जाच्या अधिकाऱ्यांकडे अथवा बदली होणाऱ्या अधिकाऱ्याच्या संवर्गास कनिष्ठ असलेल्या संवर्गामधील त्याच कार्यालयातील ज्येष्ठ अधिकाऱ्याकडे अथवा बदली होणाऱ्या अधिकाऱ्यास समकक्ष असलेल्या नजिकच्या कार्यालयातील अन्य अधिकाऱ्याकडे अतिरिक्त कार्यभार सोपविण्यात यावा. परंतु कोणत्याही परिस्थितीत बदली होणाऱ्या अधिकाऱ्याकडे त्याच्या बदलीमुळे रिक्त होणाऱ्या पदाचा अतिरिक्त कार्यभार सोपविला जाणार नाही याची दक्षता घ्यावी.

८. सदर शासन निर्णय, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संकेताक २०१४०९१२१३३३४६७२५ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.हे आदेश तात्काळ अंमलात येतील.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Dilip Sitaram Anerao

Digitally signed by Dilip Sitaram Anerao
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Urban Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Dilip Sitaram Anerao
Date: 2014.09.12 16:18:48 +05'30'

**( दि.सि.अणेराव )**

**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा.मुख्यमंत्र्याचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.

२) मा.राज्यमंत्री , नगर विकास , मंत्रालय, मुंबई यांचे खाजगी सचिव.

३) प्रधान सचिव, नगर विकास विभाग(नवि-१), मंत्रालय, मुंबई.

४) प्रधान सचिव, नगर विकास विभाग (नवि-२),मंत्रालय,मुंबई.

५) महालेखापाल,महाराष्ट्र -१ ,मुंबई / महाराष्ट्र-२, नागपूर.

६) संचालक, नगर रचना, महाराष्ट्र राज्य, पुणे. (२ प्रती)

७) सह सचिव तथा संचालक( नगर रचना), नगर विकास विभाग,मंत्रालय,मुंबई.

८) सह संचालक, नगर रचना, (सर्व)

९) उप सचिव (आस्थापना), नगर विकास विभाग, मंत्रालय,मुंबई.

१०) उप संचालक, नगर रचना मुंबई प्रदेश मुल्यांकन मुंबई

११) सहायक संचालक, नगर रचना, ठाणे शाखा

१२) श्री.ग.ना.इवरकर, नगर रचनाकार (संचालक, नगर रचना,पुणे यांच्यामार्फत)

१३) निवड नस्ती (नवि-२७)